क्रमांकः असप-१२०९/प्र.क्र.९९/०९/१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः- ३०.१२.२००९

पहाः- सा.प्र.वि. क्रमांकः- बीसीसी-२००१/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.१३.०३.२००७

## आदेश

याचिका क्र.८४५२/२००४ च्या संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि.०९.०३.२००७ रोजी दिलेले आदेश व यासंदर्भात संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून खालील कक्ष अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे:-

| **अ. क्र** | **अधिका-याचे नांव** | **सध्याचा विभाग** | **अवर सचिव पदावर पदोन्नतीने पदस्थापना केलेला विभाग** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | ४ |
| १. | श्रीमती मि.दि.पेडणेकर | पा.पु.व स्व.विभाग | वित्त विभाग |
| २. | श्रीमती स्वा.म.नानल | सा.प्र.विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ३. | श्री.दि.मा.सोनावणे (इमाव) | म.व व.विभाग | पर्यावरण विभाग (शास्त्रज्ञ श्रेणी-२ पदावर) |
| ४. | श्री.दे.के.मानकर (अजा) | नियोजन विभाग | पर्यावरण विभाग |
| ५. | श्री.म.स.कांबळे (अजा) | म.व व.विभाग | वित्त विभाग |
| ६. | श्री.रा.म.घाडगे | सा.प्र.विभाग | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| ७. | श्री उ.ना.भोसले | अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| ८. | श्री पां.द.महाजन | सा.प्र.विभाग | अल्पसंख्यांक विकास विभाग |
| ९. | श्रीमती छा.कि.वडते (विजा-अ) | नियोजन विभाग | महसूल व वन विभाग |
| १०. | श्री.ध.कु.राठोड (विजा-अ) | शा.शि.व क्री.विभाग | कृषी व पदुम विभाग |

२. सदर अधिका-यांची अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) वरील अधिका-यांची तदर्थ पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४च्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

(ब) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम तीन महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून

निवडसूचीवरील नियमित अवर सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(क) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अवर सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(ड) वरील अधिका-यांची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

(इ) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिका-यांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिका-यांनी पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२२९१६५८२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सही/-**
**(वि.ग.दळवी)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३. प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि.,
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, पा.पु.व स्व.वि./सा.प्र.वि./ म.व व.वि./ नि.वि. /अ.ना.पु.व ग्रा.सं.वि./ शा.शि.व क्री.वि./ वि.वि./ पर्यावरण वि./ प.व सां.का.वि./ कृ. व पदुम वि./ अल्पसंख्यांक विकास विभाग
५. सह/उप सचिव/(आस्थापना) पा.पु.व स्व.वि./सा.प्र.वि./ म.व व.वि./ नि.वि. /अ.ना.पु.व ग्रा.सं.वि./ शा.शि.व क्री.वि. / वि.वि./ पर्यावरण वि./ प.व सां.का.वि./ कृ. व पदुम वि./ अल्पसंख्यांक विकास विभाग
६. संबंधित अधिकारी
७. निवड नस्ती.